# औद्योगिक शिक्षणासंबंधीं सुचलेले विचार.



सन १९२६ इसवी.

( मिरज स्टेट प्रेस. )

# औद्योगिक शिक्षणासंबंधीं सुचलेले विचार.

---

मराठी इंग्रजी सर्व शाळांमध्यें औद्योगिक शिक्षण अगदीं अवश्य असलें पाहिजे. कॉलेजांतूनही अवश्य शिकविलें पाहिजे, मात्र हें शिक्षण ज्या ज्या शाळेंत सुरू करणेचें त्या त्या शाळेच्या शिक्षणाच्या मानानें असावें ह्मणजे प्राथमिक शिक्षणाचे शाळेंत औद्योगिक शिक्षणही प्राथमिक पायरीचें असावें. शाळेच्या अभ्यासक्रमाप्रमाणें औद्योगिक शिक्षणही चढते प्रमाणाचें असावें. शिक्षणांत जसे निरनिराळे विषय असतात, उदाहरणार्थ इतिहास, न्याय वेदांत, गणित इत्यादि असतात, त्याप्रमाणें औद्योगिक अभ्यासक्रमसुद्धां पुष्कळ आहेत, नावा बांधणें, गाड्या करणें, कातडी रंगविणें, तसबिरीच्या वगैरे चौकटी करणें, ठसे ह्मणजे इंग्रजींत ज्यास डाय, पंच, ह्मणतात ते करणें, निरनिराळ्या मातीचे, तेलांतील व पाण्यांतील रंग करणें. क्याबिनेटमेकिंग, नकशीचें काम करणें मग तें लांकडी असो किंवा कपलेरही असो, खवेचें काम करणें. पक्षी, जनावरें. यांचे भाते काढणे बांकें बांधणें अत्तर काढणें, सूत रंगविणें, चिटें छापणेचे ठसे करणें, रंगाच्या शिसपेन्सा किंवा त्याचें पेनांत घालणेचे तुकडे करणें साबण करणें, मेणबत्त्या करणें, मज्याळें करणें फिजिकल अपेरेटस करणें, केमिकल लॅबोरेटरीत काम करितांना निरनिराळ्या रंगाचे साखांतून तेलाचे व पाण्याचे रंग करणें, फर्निचर मेकिंग बिडाचे व इतर सर्व जातीचे ओतकाम करणें टेकनिकल विद्यालयांत लागणारी सर्व हत्यारें दुरबिणी तांब्याचे वेध घेणेचे स्टॅन्ड व कॅमेरे फोटोचे व सिनेमाचे, ड्रासप्लेटी करणें सोनारी कामें तांबटाची कामें, कटकचें किंवा माल्टाचें तारकशी काम करणें लांकडी किंवा दगडी इन्‌लेइंग करणें, कागद करणें, जस्ती पत्र्याची कामें करणें लोकर रंगविणें, लेसकरी व सुती गालिचे करणें, सतरंज्या करणें, इत्यादि अनेक गोष्टी औद्योगिक

शाळेंत शिकवितां येतील; व त्यांच्या खर्चाबद्दल, सरकारास कांहींच पंचाइत पडणार नाहीं, प्रथम कांहीं दिवस तोटा होईल असें दिसतें; व तसा तोटा झाला तरी औद्योगिक शिक्षणाच्या नात्यानें तो तोटा असें सरकारास ह्मणतां येणार नाहीं, व सरकार ह्मणणार नाहीं. कारण जो तोटा प्रथम होईल तो, शाळेचा खर्च असें सरकार खास समजतील. विद्या शिक्षणाच्या शाळेंत ज्याप्रमाणें परीक्षा घेऊन पास होणारास वरचे वर्गांत घालतात. त्याप्रमाणें औद्योगिक परिक्षा पास होईल त्याला औद्योगिक शाळेंतील वरील वर्गांत घालावें. शिक्षण ह्मणजे नुसतें लिहितां वाचतां येणें किंवा कॉलेजातून बी. ए. एम्. बी. बी. एस. होणें किंवा सिव्हिल इंजीनियर होणें किंवा कोणचेही शाखेंत एम्. ए. होणें एवढेंच नव्हे तर गांवाला ज्याप्रमाणें बारा बलुती अवश्य लागतात त्याप्रमाणें विद्येबरोबरच सर्व धंदे शिक्षेणही देणें त्यालाच विद्यादान किंवा विद्यालय ह्मणावें ही बलुती व ह्या प्रत्येक बलुतेदाराचे हताखालीं काम करणारे ज्याप्रमाणानें लागतात त्याप्रमाणानेंच नारायणानें त्या त्या प्रमाणानें तें, ते शिकण्याची बुद्धी व इच्छा त्यांना दिलेली आहे, एवढ्याकरितां त्या त्या भागांत त्यांना पूर्णता येईल अशी विद्यादानाची जेथें सोय असेल तेंच विद्यालय व अशीं विद्यालयें ठेवणें हेंच मुख्य कर्तव्य होय. मद्रास इलाख्यांतील रामानुजन हे फक्त मॅट्रिक पास झालेले इसम सरकारांत कारकून होते त्यांचे डोकें गणित शास्त्रांत इतकें तरतरीत आहे कीं त्यांनीं केंब्रिज विद्यालयांत न सुटलेली बरीचशी उदाहरणें सोडवून तिकडे पाठविलीं व विलायतेतील गणितशास्त्री यांना त्याचें कौतुक व आदर वाटून त्यांनीं तेथील सरकारास व हिंदुस्थानसरकारास लिहून त्यांना स्कॉलरशिप दिली व त्यांना एफ्. आर. सी. एस्. केलें त्यांना इकडील शिक्षणक्रमाप्रमाणेंच वर येणेंस लाविलें असतें तर तें कधींही वर आले नसते. अशांना वर आणण्यास ज्या सवलती देणें भाग व अवश्य आहे त्या देऊन अशा लोकांना वर

आणणें हेंच विद्यादान, न देऊन खितपत ठेवणें हें विद्यादान नव्हे. तसेंच धंदे शिक्षणांत ज्याला ट्रेड सीक्रेट ह्मणतात, तें किंवा कोणत्याही शाखेंत काम करतांना त्या त्या कामांत कोणत्या गोष्टी विशेष लक्ष देऊन पाहिल्या पाहिजेत व त्या त्या गोष्टी कशा व केव्हां पासून पहाव्या याचा सर्व खुलासा सोपपत्तिक शिकविला पाहिजे. कालेजांत ज्याप्रमाणें प्रोफेसर लेक्चर देतात, व लॅबोरेटरीबॉय प्रयोग दाखविण्यास मदत करतो त्याप्रमाणें कामकरी काम करीत असतांना त्यांतील प्रोफेसरांनीं लेक्चर देऊन ते ते विषय सुगम व सोपे करून शिकविले पाहिजेत, व त्याकरितांच शिकविणारे प्रोफेसर कॉलेजशिक्षण पुरें झालेले असले पाहिजेत. लेक्चरचे वेळीं काम करून दाखवावें लागेल तेव्हां दाखविण्याइतकें औद्योगिक शिक्षण मिळालेले पाहिजेत, येथून जे जे जिन्नस परदेशांत जातात त्या त्या पासून होणारे सर्व जिन्नस करणेची कृति शिकवून त्याचें पूर्ण व सोपपत्तिक शिक्षण मिळालें पाहिजे व तसें शिक्षण मिळाल्यावर ते लोकही कांहीं कल्पना काढून पेटंट घेणेच्या लायकीचे होतील व असे लोक निर्माण करणें हेंच औद्योगिक खरें शिक्षण ह्मणतां येईल, नुसतें लोहार, सुतार, तयार करण्याच्या शाळा ह्या औद्योगिक शिक्षणालयांतील किंवा औद्योगिक युनिव्हर्सिटींतील प्राथमिक शाळाच ह्मणणें ज्यास्त शोभेल. प्रत्येक कारखान्यांतील टाकाऊ माल ह्मणजे ज्याला इंग्रजींत वेस्ट ह्मणतात त्याचा उपयोग काय कसा कोठें करावा इत्यादि सर्व तऱ्हेचें शिक्षण मिळणेची सोय होईल अशी औद्योगिक युनिव्हर्सिटी सरकारानीं काढिली पाहिजे व हेंच खरें शिक्षण असें सरकारला वाटतें व वाटणार ह्यांत संशयही नाहीं. फार कशाला, सिव्हिल इंजिनियरिंग कॉलेजमधून फिजिक्स शिकविलें जातें पण तें कशाला नुसतें घोकंपट्टीला नव्हे, तर, त्यांतील

तत्वें त्यांना घरें बांधतांना, त्याचा उपयोग त्यांना व्हावा म्हणून, पण अनुभव मात्र तसा मुळीं येत नाहीं. कारण, लाईट् अप्लाइड् टूएंजिनियरिंग, व्हेन्टिलेशन् अप्लाईड् टू एंजिनियरिंग, आकुस्टिक्स अप्लाइड् टू एंजिनियारिंग, इत्यादि शास्त्रें सोपपत्तिक शिकविल्या जात नाहींत, अर्थात इमारतींत प्रकाश कोठून कसा व कितपत घ्यावा इमारतींत तळघरें असतील तर तेथें हवा व प्रकाश कसा घ्यावा इमारतींत अवाज घुमतो तो कसा काढावा, ह्या गोष्टी सोपपत्तिक व खुलासेवार न शिकविल्यानें फार अडचणी व त्रास होतो. ह्या गोष्टी औद्योगिक शिक्षणांत आल्या नाहींत तर अगदीं निरुपयोग होईल. उदाहरणार्थ घ्या कीं एखादी बंदूक माशी बसविणेस आली माशी बसविणेकारितां गणितशास्त्र लागतें तें शिकलेले प्रोफेसरांनीं औद्योगिक क्लासातील मुलांना ती तत्वें सांगून त्यांचे कडून बंदूकीस माशा बसवून घेतल्या पाहिजेत, ह्मणजे ह्यावरून औद्योगिक युनिव्हरसिटी व शाळा यांचे उपयोगी असलेलें तें तें गणित तें तें फिजिक्स तें तें रसायनशास्त्र अवश्य असलेंच पाहिजे व ह्मणूनच कालेजांत सुद्धां औद्योगिकशिक्षण असलें पाहिजे. एवढेंच नाहीं, तर, अत्यंत जरुरीचें व अवश्य असलेंच पाहिजे हें कोणाच्याही लक्षांत सहजच येईल. अशीं पुष्कळ उदाहरणें दाखवितां येतील, लोहारी, सुतारी व इतर यांत्रिक कामें चांगली करण्यास कालेजशिक्षण फार अवश्य आहे. दवाखान्यांतील चिमट्यापैकीं एक जातीच्या चिमट्याला किगनचा चिमटा असें नांव आहे. त्यांनीं आपरेशनकारितां त्यांना ज्या तऱ्हेचा चिमटा पकडीचा करवून घेतला त्यानें फार सोय झाली. डॉक्टर, फिजिक्स शिकविणार प्रोफेसर, केमिस्ट्रि शिकविणारे प्रोफेसर, यांना यांत्रिक साधनें त्या त्या गोष्टी व त्यांतील उपपत्ति समजलेलें व असें शिक्षण मिळालेले लोक जर अशी साधनें करून देण्यास मिळतील तर आपलें कितीतरी लोक सरकारास भूषण आणणारे निपजून आपले सरकारचा व देशाचा गौरव करतील.

ह्याकीरतां प्रत्येक शाळेंत कालेजांत औद्योगिकशाळा असणें अवश्य आहेत एवढेंच नव्हे तर अत्यंत अवश्य आहे असें कोणासही वाटल्या शिवाय राहणार नाहीं. आतां गांवाला जशीं बलुतीं लागतात त्याप्रमाणें, तालुका जिल्हा इलाखा व देश ह्यांतील लोकांस सर्व तऱ्हेच्या धंद्यांतील प्रत्येक निदान शक्य तितक्या शाखेंतील प्रथम व लागलीच बाकीच्या शाखेंतील औद्योगिक, प्राथमिक, मध्यम. व उच्च असें शिक्षण मिळालेंच पाहिजे व असें शिक्षण देऊन प्रजेला सुशिक्षित, स्वावलंबी केलें पाहिजे, नाहींतर, एखाद्यावर्षी मेघराजांनीं अवकृपा करतांच रिलिफकामाकडे आ करून पहात बसणारी अशीं निरुपयोगीं प्रजा ठेवणें व त्यांना इतकें लुले ठेवणें केव्हांही श्रेयस्कर नाहीं हें अनुभवानें ढळढळीत व स्पष्ट दिसत आहे. अर्थात् स्वावलंबी वाटेल त्या औद्योगिक-शाखेंत काम करून बाहेरून आपल्या देशांत पैसा आणून स्वस्थ राहणारी आपली प्रजा आहे असें आपल्या प्रभूला दाखऊन आपल्या देशबांधवांना, सरकारांना आनंद देणारी अशी आपली प्रजा करणें हें आद्य कर्तव्य आहे असें वाटलेंच पाहिजे, वाटतें, व वाटणार ह्यांत बिलकूल संशय व शंका नाहीं.

आतां हे वर्ग कसे असावेत वर्ग ह्मणजे औद्योगिक युनिव्हरसिटीचा क्रम कसा असावा व त्यांत कोणकोणास घ्यावें हें आतां सांगतों. ह्या शाळेंत मराठी पांच सहा व सात इयत्तेतील मुलें इंग्रजी शाळेंतील चार पांच सहा व सात ह्या वर्गांतील मुलें व कॉलेजांतील सर्व क्लासांतील विद्यार्थी यांना घ्यावें. आतां ही मुलें व विद्यार्थी घेताना त्या त्या वर्गांत दोन तीन वर्षें राहिलेली व शिक्षण क्रमाला निरुपयोगी अशी मुलें व विद्यार्थी यांना घ्यावें. आतां वर्गांची रचना व वेळापत्रक सांगतों. शाळा नऊ ते पांच पर्यंत असावी एक ते दोन जेवणास सुटी असावी, अठवड्यांत एक दिवस सहा ते दहा पर्यंत चार तास शाळा असावी रविवारीं सुटी असतेच.

शाळेंत फी ठेऊं नये, पहिलीं दोन वर्षें प्रत्येकास रोज तीन आणे पासून साडेतीन आणे दर द्यावा. पुढील सर्व वर्षांत तो ज्या वर्गाचें काम करील ह्मणजे त्याला बाहेर जे मिळेल त्याचे तीन चतुर्थांश मजूरी त्याला द्यावी. व ही मंडळी जे कांहीं सामान, अप्यॉरेटस् यंत्रें करतील त्यांचें नफ्यातून शेंकडा पंचवीस प्रमाणें त्यांना देत जावें. शिवाय एखादें नवीन यंत्र अगर युक्तीचें कांहीं काम पाहिजे असल्यास शाळेंत, काय काम करणेस कशा जिन्नस पाहिजे ते लिहून एक नोटीस लावावी. त्या मुदतींत जे जे ते जिन्नस करून आणतील त्यांपैकीं ज्यांचा जो बहुमतानें पास होईल, त्याबद्दल त्यांना बक्षिसें द्यावीत. व ते ते जिन्नस त्या शाळेंत करून विक्रीस ठेवावेत. पेटंट घेणें लायख; ती युक्ती असेल तर त्याचा मोबदला ह्मणून त्यांना सर्वानुमते ठरेल तें जास्त द्यावें. ह्मणजे शाळेनें तें पेटंट विकत घेतलें असें समजावें. औद्योगिक शाळेंत, फिजिक्स्, केमिस्ट्री, मेक्यॅनिक्स हे सर्व अह्मांस असें शिकविणेचें अशा शाळेंत, शिकणारांना कामें देणेची तीं औद्योगिक कामाला उपयोगीं पडतील असे जिन्नस करण्यास द्यावे. औद्योगिक शिक्षणाचे उपयोगी असी लायब्ररी असावी, व ह्या विषयांतील सर्व मासिकें घ्यावीत. ह्या शाळेंतून तयार झालेले लोक मास्तर किंवा प्रोफेसर नेमावेत. हे शिक्षक जिल्हा, तालुका शाळांत नेमावेत. या शाळेंत एक चांगलें पदार्थ संग्रहालय ह्मणजे म्युझियम ठेवावें. कोठें कोणाचा जिन्नस होतो ह्याची माहिती मिळेल अशी सोय असावी. ही माहिती मिळविणारी टोळी सर्व हिंदुस्थानभर फिरती ठेवावी. ह्यांत भूगर्भशास्त्रवेत्ते, वनस्पतिशास्त्रवेत्ते कीटकशास्त्रवेत्ते, इत्यादि लोक असावेत.

ह्याप्रमाणें साधारण टाईमटेबल झालें, ह्या सर्व वर्गांत काम देणेचें तें, फिजिकल व केमीकल

अप्यारेटस् करवून घ्यावें. ज्यांचा इकडे कल नसेल त्यांना कमार्शियल ट्रेनिंगकडे, ड्रॉईंग ट्यानिंग, फरनिचर मेकिंग, साखर करणें ट्यानिन काढणें, इकडून कच्चा माल जातो त्याच्यापासून निघणारे जिन्नस तयार करणेस शिकवावेत. असे लोक तयार झाले ह्मणजे त्यांचेकडून लहान लहान कारखाने काढवून ते फायदेशीर होतात अशी त्यांची खात्री करून त्या त्या इसमांना सरकारांनीं भांडवल व यंत्रें देऊन, माल आपण ( ह्मणजे सरकारांनीं ) विकत घेऊन, सरकाराचे पैसे फिटले ह्मणजे तो कारखाना त्यांला देऊन टाकावा, असा क्रम ठेविला ह्मणजे, प्रत्येक घर किंवा अळी लहान कारखाने होऊन लोकांस ह्मणजे आपल्या प्रजेस आपले पायावर सरकारांनीं उभें केल्याचें श्रेय व आशीर्वाद घ्यावा, याप्रमाणें झालेवर मग मोठे प्रमाणांत आश्रय देऊन अर्थ शास्त्रांत बाउंटी ह्मणतात ती देणेची लोकांत ऐपत आल्यावर त्यांना बाउंटी सरकारांनीं देऊन माल परदेशी पाठविण्यास सांगावें ह्मणजे देशाची औद्योगिक व सांपत्तिक स्थिति वाढेल व सर्व सरकारास आशीर्वाद देऊन कायमचे ऋणी व राजनिष्ठ राहून आनंदी आनंद होऊन जाईल व अशी स्थिति ईश्वराचे व सरकारचे कृपेनें येण्यास लवकर सुरवात होवो, व ईश्वर निरंतर लोकांस व सरकारास यश देवो, अशी प्रार्थना करतों.

---

पहिलें वर्ष चौथी इयत्ता.

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | घन मारणें. | चिपिंग. | रंधा मारणें. | घन मारणें. | कानसणें. | इंग्रजी. | गणित. |
| मंगळवार. | चिपिंग. | घन मारणें. | रंधा मारणें. | घन मारणें. | कानसणें. | मराठी. | ड्राइंग. |
| बुधवार. | रंधा मारणें | चिपिंग. | घन मारणें. | घन मारणें. | कानसणें. | इंग्रजी. | गणित. |
| गुरुवार. | घन मारणें. | चिपिंग. | घन मारणें. | रंधा मारणें. | कानसणें. | मराठी. | ड्रॉइंग. |
| शुक्रवार. | चिपिंग. | घन मारणें. | रंधा मारणें. | घन मारणें. | कानसणें. | इंग्रजी. | गणित. |
| शनिवार. | घन मारणें. | रंधा मारणें. | घन मारणें. | चिपिंग. | .... | .... | .... |

सूचनाः— ह्या व पुढील पत्रकांत १ ते २ हा तास सुटीचा आहे.

## पहिलें वर्ष चौथी इयत्ता, मग दुसरें वर्ष पांचवी इयत्ता.

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | कानस. | पॉलिश कानस. | चौकोनी नट करणें. | पातळीनें चौकोनी विटा करणें | इंग्रजी. | हत्यारें चोळणें. | ड्राइंग. |
| मंगळवार. | ” | ” | ” | ” | मराठी. | ” | लांकडी घाट |
| बुधवार. | ” | ” | ” | ” | इंग्रजी. | ” | ड्रॉइंग. |
| गुरुवार. | ” | ” | ” | ” | मराठी. | ” | लांकडी घाट |
| शुक्रवार. | ” | ” | ” | ” | इंग्रजी. | ” | ड्रॉइंग. |
| शनिवार. | ” | ” | ” | ” | .... | .... | .... |

## तिसरें वर्ष.

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | लेथ. | शेपिंग. | ड्रिलिंग. | गुणे करणें. | फेसिंग. | मराठी. | इंग्रजी. |
| मंगळवार. | शेपिंग | ड्रिलिंग. | लेथ. | फेसिंग. | सेंटिंग स्क्वेअर. | मराठी. | ” |
| बुधवार. | ड्रिलिंग. | लेथ. | शेपिंग, ड्रिलिंग | फेसिंग. | पाटर्न मेकिंग | गणित. | ” |
| गुरुवार. | लेथ. | शेपिंग,प्लेनिंग. | पाटर्न मेकिंग. | फेसिंग. | फेसिंग | ड्रॉइंग. | ” |
| शुक्रवार. | लेथ. | लेथ. | शेपिंग,प्लेनिंग. | फेसिंग. | पाटर्न मेकिंग. | गणित. | ” |
| शनिवार. | लेथ. | फेसिंग | पाटर्न मेकिंग. | पाटर्न मेकिंग | .... | .... | .... |

सहावी ईयत्ता, पहिलें वर्ष, चौथीप्रमाणें, दुसरें, पाचवी प्रमाणें, मग हें.

## चौथें वर्ष, सातवी इयत्ता.

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | माशिन शॉप. | माशिन शॉप. | पाटर्न मेकिंग. | पाटर्न मेकिंग. | अॅपरेटस करणें. | ओत काम | ग्लास ब्लोइंग. |
| मंगळवार. | माशिन शॉप | माशिन शॉप | पाटर्न मेकिंग. | पाटर्न मेकिंग. | अॅपरेटस करणें. | अप्लाईड मेक्यानिक्स | ओत काम. |
| बुधवार. | माशिन शॉप. | माशिन शॉप | अॅपरेटस करणें. | अॅपरेटस करणें. | पाटर्न मेकिंग | ग्लास ब्लोइंग. | ओत काम. |
| गुरुवार. | माशिन शॉप. | मशिन शॉप. | पाटर्न मेकिंग. | पाटर्न मेकिंग. | अॅपरेटस करणें. | ग्लास ब्लोइंग. | ओत काम. |
| शुक्रवार. | पाटर्न मेकिंग | पाटर्न मेकिंग. | अॅपरेटस करणें | अॅपरेटस करणें. | माशिन शॉप. | अप्लाईड मेक्यानिक्स. | अप्लाईड मेक्यानिक्स. |
| शनिवार. | ग्लासब्लोइंग | अॅपरेटस करणें. | अॅपरेटस करणें. | पाटर्न मेकिंग | .... | .... | .... |

पहिलें वर्ष चौथीचें, दुसरें पाचवीचें, तिसरें सहावीचे, मग हें.

पी. ई. ते बी. ए. पि. ई. इंटर, ज्यूनियर बी. ए. व बी. ए; पहिले वर्ष.

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | चिपिंग. | फायलिंग | फेसिंग. | नट करणें. | रंधा. | इंग्रजी. | ड्रॉइंग. |
| मंगळवार. | चिपिंग. | फाइलिंग. | फेसिंग. | नट करणें. | रंधा. | इंग्रजी. | ड्रॉइंग. |
| बुधवार. | पातळी. | रंधा. | चिपिंग. | फायलिंग. | नट करणें | ड्रॉइंग. | फेसिंग. |
| गुरुवार. | नट करणें | चिपिंग. | फाइलिंग. | ड्रॉइंग. | रंधा. | फेसिंग. | मेक्यानिक्स |
| शुक्रवार. | मेक्यानिक्स. | पातळी. | रंधा. | चिपिंग. | फेसिंग. | नट करणें. | ड्रॉइंग. |
| शनिवार. | लाकडी बाड | फाइलिंग. | चिपिंग. | रंधा. | .... | .... | .... |

## पी ई ते बी. ए इंटर, जूनिअर. बी. ए

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | ड्रिलिंग. | फेसिंग. | लाकडी घाड. | मेक्यानिक्स. | लेन्स, ग्राइंडिंग. | लेथ. | फिझिक्स. |
| मंगळवार. | फेसिंग. | लाकडी घाड | ड्रिलिंग. | लेथ. | मशिन शॉप. | ड्रॉइंग. | लेन्स, ग्राइंडिंग. |
| बुधवार. | मेक्यानिक्स. | फेसिंग. | लाकडी घाड. | लेथ. | लेन्स, ग्राइंडिंग. | माशिन शॉप. | मशिन शॉप. |
| गुरुवार. | लेथ. | माशिन शॉप. | लेन्स, ग्राइंडिंग | मेक्यानिक्स. | फेसिंग. | लाकडी घाड | केमिस्ट्री. |
| शुक्रवार. | फेसिंग | लेन्स, ग्राइंडिंग | लेथ. | मेक्यानिक्स. | मशिन शॉप. | लाकडी घाड | सर्व जातीचे, डाक घालणें. |
| शनिवार. | केमिस्ट्री. | डाक घालणें. | ओत काम | पाटन करणें. | .... | .... | .... |

पहिलें वर्ष, पी. ई. प्रमाणें, मग हें.

## पी ई. बी. ए सिनिअर. बी. ए.

| तास. | ९ ते १० | १० ते ११ | ११ ते १२ | १२ ते १ | २ ते ३ | ३ ते ४ | ४ ते ५ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सोमवार. | ओत काम | पाटर्न करणें. | डाक घालणें. | फेसिंग. | लेथ. | मशिन शॉप | ड्रॉइंग. |
| मंगळवार. | पाटर्न करणें. | डाक घालणें. | ओत काम. | लेथ. | फेसिंग. | माशिन शॉप. | मेक्यानिक्स |
| बुधवार. | ड्रॉइंग. | मेक्यानिक्स. | लेथ | माशिन शॉप | पाटर्न करणें | डाक घालणें | फेसिंग. |
| गुरुवार. | फेसिंग. | फिझिक्स. | लेथ | पाटर्न करणें. | ओत काम | डाक घालणे | माशिन शॉप |
| शुक्रवार. | ओत काम | डाक घालणें | मशिन शॉप. | लेथ | पाटर्न करणें. | मेक्यानिक्स | फिझिक्स. |
| शनिवार. | माशिन शॉप. | लेथ. | केमिस्ट्री | फिझिक्स. | .... | .... | .... |

पहिलें वर्ष, पी. ई. प्रमाणें, इंटर प्रमाणें मग हें.